**कोषागारातून रोखदेय अनुदान**

**ग्रामीण भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारक उपाययोजनांसाठी अनुदान- आर्थिक वर्ष २००९-२०१०.**
**"मागणी क्र.सी -६-२२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य-योजनेतर"**

**महाराष्ट्र शासन**
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांक- टंचाई-१००९/प्र.क्र.५०/ पापु-१४
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक :- ३० मार्च , २०१०**

**संदर्भ :-**

१. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. एससीवाय-०५ /२००९/प्र.क्र.३६ /म-११, दि. २ मे,२००९, दि.१२ मे, २००९, दि. २५ मे, २००९, दि.२५ऑगस्ट,२००९, दि.२७ऑगस्ट,२००९
२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.एससीवाय-०३ /२०१०/प्र.क्र.१८/म-११, दि. ६ मार्च, २०१०
३. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग शासन निर्णय क्र.टंचाई १००९/प्र.क्र.५०/पापु १४ दि.२ मे २००९, दि.१३ मे,२००९, दि. २८ मे, २००९, दि. २८ जुलै, २००९, दि. ३० जुलै, २००९, दि. २८ ऑगस्ट, २००९, दि. ७ सप्टेंबर, २००९, दि.२५ मार्च, २०१०
४. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग शासन निर्णय क्र.टंचाई-१००९/प्र.क्र.५०/अ/ पापु-१४, दि.१७ मार्च, २०१०
५. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग शासन निर्णय क्र.टंचाई-१००९/प्र.क्र.५०/ब/ पापु-१४, दि.१७ मार्च, २०१०
६. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग शासन निर्णय क्र. टंचाई २००९/प्र.क्र.४९/पापु १४, दि.२ मे२००९, दि. २८ मे, २००९, दि. २९ जुलै, २००९, दि. ७ सप्टेंबर, २००९, दि.१५ मार्च,२०१०
७. जिल्हाधिकारी, पुणे यांचे पत्र क्र.रोहयो/अका-२/२०८/१०, दि.२९ मार्च, २०१०

**प्रस्तावना :-**

ग्रामीण व नागरी भागातील पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात येणा-या उपाययोजनांवरील खर्च लेखाशिर्ष "२२४५-नैसगिक आपत्ती निवारणासाठी सहाय्य" या लेखाशिर्षाखाली, महसूल व वन विभागाकडून उपलब्ध होणा-या अनुदानातून भागविण्यात येतो. सन २००९-२०१० या आर्थिक वर्षात पाणी टंचाई निवारणार्थ घेतलेल्या उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी महसूल व वन विभागाने लेखाशीर्ष २२४५००९३ (योजनेतर) अंतर्गत संदर्भाधीन क्र. १ व ३ येथील शासन निर्णयान्वये पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाकडे रु.१६१००.०० लक्ष अनुदान वर्ग केले आहेत. सदर अनुदानाचे संदर्भ क्र.३,४,५ येथील शासन निर्णयान्वये ग्रामीण टंचाई निवारण कार्यक्रमासाठी रु.१५१२५.५५लक्ष तर संदर्भ क्र. ६ येथील शासन निर्णयान्वये नागरी टंचाई निवारण कार्यक्रमासाठी रु.९७४.४५ लक्ष या प्रमाणे संबंधित विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांना वाटप करण्यात आलेले आहे.

सन २००९-१० या आर्थिक वर्षात लेखाशीर्ष २२४५००९३ (योजनेतर) अंतर्गत संदर्भ क्र.३,४,५ येथील शासन निर्णयान्वये ग्रामीण भागातील पाणी टंचाई निवारणार्थ घेण्यात येणाऱ्या उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी जिल्हाधिकारी, पुणे यांना रु. ७२०.३१ लक्ष अनुदान उपलब्ध करुन देण्यात आले होते. सदर अनुदानापैकी संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये राष्ट्रीय आपदा आकस्मिक निधी (NCCF) मधून (आकस्मिकता निधी अग्रीमातून) वितरित केलेल्या रु.३८५.७६लक्षपैकी रु.१०.०० लक्ष अनुदान संदर्भ क्र.७ येथील पत्रान्वये जिल्हाधिकारी, पुणे यांनी शासनास अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे समर्पित केले आहेत.

जिल्हाधिकारी, पुणे यांनी केलेले रु.१०.०० लक्ष समर्पण स्वीकारुन, सदर रु. १०.०० लक्ष इतका निधी वाहतूक व तात्काळ दुरुस्तीसाठी वितरित करावयाचा असल्याने ग्रामीण भागात पाणी टंचाई निवारणार्थ घेतलेल्या टँकरने/बैलगाडीने पाणी पुरवठा करणे, नळ योजनांची विशेष दुरुस्ती, विंधण विहिरींची विशेष दुरुस्ती व विहिरी अधिग्रहित करणे या उपाययोजनांसाठी संबंधित जिल्हाधिकारी यांना उपरोक्त निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

ग्रामीण भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ राबविलेल्या उपाययोजनावरील खर्च भागविण्यासाठी सन २००९-२०१० या आर्थिक वर्षात लेखाशीर्ष २२४५ ००९३ खाली आकस्मिकता निधी अग्रिमातून उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानापैकी **जिल्हाधिकारी पुणे यांनी समर्पित केलेले रु.१०.००लक्ष अनुदान स्वीकारण्यात येत आहे. ग्रामीण भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ प्रस्तावनेत नमुद केलेल्या उपाययोजनावरील खर्च भागविण्यासाठी जिल्हाधिकारी, चंद्रपूर यांना सदर समर्पित अनुदान रु.१०.०० लक्ष (रुपये दहा लक्ष फक्त) खालील अटींच्या अधीन राहून अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे मंजूर व मुक्त करण्यात येत आहेत.**

२. जिल्हाधिकारी यांना खालील अटींच्या अधीन राहून अनुदानाचे वाटप करण्यात येत आहे.

१) संबंधित विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांनी टंचाई कालावधीमध्ये राबविण्यात आलेल्या सर्व उपाययोजनांवरील प्रत्यक्षात झालेला खर्च व उपलब्ध करुन दिलेला निधी यांचा समतोल साधून अनुदानाचे वाटप करावे.

२) जिल्हाधिकारी यांना उपलब्ध करुन दिलेला निधी तात्काळ खर्ची टाकण्याबाबत कार्यवाही करावी व उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र तात्काळ शासनास सादर करावीत.

३) जिल्हाधिकारी कार्यालयांनी कोषागारातून काढलेल्या रक्कमा कोणत्याही परिस्थितीत अखर्चित राहणार नाहीत याची दक्षता घ्यावी व रक्कमा अखर्चित राहत असल्यास तात्काळ शासनाच्या निदर्शनास आणून देण्यात यावे. तसे न झाल्यास होणा-या आर्थिक अनियमिततेसाठी संबंधित आहरण व संवितरण अधिकारी जबाबदार असेल.

**४) जिल्हाधिकारी यांनी उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाचे तात्काळ आदेश निर्गमित करावेत.**

३.	सदर खर्च, मागणी क्रमांक **“सी-६ लेखाशिर्ष-२२४५- नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य-०१- अवर्षण -१०२- पिण्याच्या पाण्याचा पुरवठा - १०२ (००) (०१) निकडीच्या पाणी पुरवठा योजना (२२४५००९३) (दत्तमत) (योजनेतर)” या लेखाशिर्षाखाली चालू वित्तीय वर्षात (सन २००९-२०१०) आकस्मिकता अग्रिमातून भागविण्यात यावा.**

४.	यासंबंधीचे देयक कोषागारात सादर करताना त्यावर लाल शाईने सदर खर्च आकस्मिकता निधीतून करण्यात आला आहे, अशी नोंद घेण्यात यावी व सदर प्रकरणी पूरक अनुदान प्राप्त झाल्यावर तो खर्च मागणी क्रमांक **“सी-६ लेखाशिर्ष-२२४५- नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य-०१- अवर्षण -१०२- पिण्याच्या पाण्याचा पुरवठा - १०२ (००) (०१) निकडीच्या पाणी पुरवठा योजना (२२४५००९३) (दत्तमत) (योजनेतर)” या लेखाशिर्षाखाली अंतिमतः खर्ची टाकण्यात यावा. याकरिता आकस्मिकता संकेतांक (८००० ५०७२) असा आहे.**

५.	कोणत्याही परिस्थितीत मंजूर अग्रिम निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त होणार नाही व हा निधी दिनांक ३१ मार्च, २०१० पूर्वी करण्यात येईल, याची दक्षता नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी.

६.	आहरण व संवितरण अधिका-यांनी कोषागार/उपकोषागार यांजकडे पाठविण्यात येणाऱ्या व बीलासोबत जोडल्या जाणा-या कॉम्पुटर स्लीपमध्ये गौण /उपलेखाशिर्षाचा “संगणकयंत्र” संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा. तसेच कोषागारातून/उपकोषागारातून आहरीत केलेल्या रक्कमेचा अहवाल शासनास सादर करावा. तसेच, दरमहा होणा-या खर्चाचे पत्रक व उपयोगिता प्रमाणपत्रे पुढील महिन्याच्या ५ तारखेपर्यंत या विभागास आणि महसूल व वन विभागास पाठविण्यात यावेत.

७.	सदर शासन निर्णय शासनाच्या w.w.w.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक **२०१००३३०२०५०२८००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-

**(सु.वि. कोळेकर )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. प्रधान सचिव, (मदत व पुनर्वसन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
२. सचिव,वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
३. विभागीय आयुक्त, पुणे/नागपूर विभाग
४. जिल्हाधिकारी, पुणे, चंद्रपूर
५. जिल्हा पाणी पुरवठा अधिकारी, पुणे, चंद्रपूर

६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद , पुणे, चंद्रपूर
७. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे, चंद्रपूर
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, चंद्रपूर
९. सह संचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष,नविन प्रशासकिय भवन,५ वा मजला,मुंबई-४०० ०३२.(०२ प्रतींसह)
१०. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई-४०० ०२१.
११. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
१२. निवासी लेखा अधिकारी,मुंबई.
१३. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोंकण भवन, नवी मुंबई.
१२. उपमुख्य लेखा परीक्षक,स्थानिक निधी लेखा (सर्व)
१३. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता).
१४. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता).
१५. कक्ष अधिकारी, व्यय-३ व व्यय-९, अर्थसंकल्प-३ व अर्थसंकल्प-४, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई.
१६. कक्ष अधिकारी,म-७/म-११/ब-१/पिएसी/पिएसी-१, महसुल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई.
**१७.** निवड नस्ती, पापु-१४.